**"मुंबईचे नगरपाल" यांचे कार्यालयातील उपनगरपाल यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : शेरीफ -१६१६/११३०/प्र.क्र.१८९/का- नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक : २१ डिसेंबर, २०१६.

वाचा :-१) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र.वेपूर-१२९७/सुधारणा-२३९/सेवा-१०, दि. ३१/१२/१९९७.

२) उपनगरपाल, मुंबई यांचे क्र.१८७८/२०१६, दि. १६/१०/२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

शासन अधिसूचना वित्त विभाग क्र.वेपूर-१२९७/सुधारणा-२३९/सेवा-१०, दिनांक ३१/१२/१९९७ अन्वये मुंबईचे नगरपाल कार्यालयासाठी "मुंबईचे शेरीफ" यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे.

उपनगरपाल, मुंबई यांनी त्यांच्या दि. १६/१०/२०१६ च्या पत्रात नमूद केल्यानुसार माहे डिसेंबर, २००९ पासून "नगरपाल" हे पद रिक्त आहे. सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार अन्य कोणत्याही अधिकाऱ्याकडे दिलेला नाही. यास्तव कार्यालयीन कामकाजावर होणारा परिणाम विचारात घेता उपनगरपाल यांना वित्तीय बाबींकरिता "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनुक्रमांक ३, नियम क्र.२ समोरील रकाना क्र.६ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून उपनगरपाल, मुंबई यांना नगरपाल यांची नियुक्ती होईपर्यंत वित्तीय बाबींकरिता "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ तसेच शासन निर्णय, क्रमांक विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक सांकेतांक क्र २०१६१२३११६२२४८७९१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LA Cum Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=714efbf760da6c143fdf63d5ec3da8a8957b82d41451a5f202043ce4895e4205, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2016.12.31 16:25:37 +05'30'

**( नी.प्र.धोटे )**

विधि सल्लागार-नि-सह सचिव

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा / मुळ शाखा), मुंबई,
३. प्रबंधक / प्राथोनोटरी आणि सिनीयर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई
४. उपनगरपाल, नगरपाल यांचे कार्यालय, जुने सचिवालय, कर्मवीर भाऊराव पाटील मार्ग, मुंबई-३२ यांना विनंती करण्यात येते की, या संदर्भात पुढील आवश्यक ती कार्यवाही करुन या विभागास अवगत करावे.
५. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,
६. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी, सेवा -१०/व्यय-६,व्यय-५/विनियम शाखा, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्या.२) यांना माहिती तथा आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,
११. कक्ष अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्या.२३,२४ व २५)
१२. निवड नस्ती.